जालना, रायगड व परभणी येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या (प्रत्येकी २६ पदे) अशी एकूण ७८ अस्थाई पदे पुढे चालु ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.१६८/आरोग्य-४

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते. रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१८.

वाचा

१) उपसंचालक (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष-९/टे-४/ जीएनएमजालना/अपदे/१७४२-४३/१८, दि.२९.०५.२०१८
२) उपसंचालक (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष-९/टे-४/जीएनएमरायगड/अपदे/१४८४-८५/१८, दि.४.०५.२०१८
३) उपसंचालक (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष-९/टे-४/जीएनएमपरभणी/ अपदे/१७३४-३५/१८, दि.२८.०५.२०१८
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.१६८/आरोग्य-४, दि.२२.०६.२०१८.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.

शासन निर्णय

जालना, रायगड व परभणी येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या (प्रत्येकी २६ पदे) अशा एकूण ७८ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दि.१६.०२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे.

| अ. क्र. | पदनाम व संवर्ग | वेतनश्रेणी | पदसंख्या/ जी.एन.एम | चार जी.एन.एम. नर्सिंग स्कुलची अस्थाई पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य (वर्ग-३) | ९३००-३४८०० (४४००) | १ | ३ |
| २ | उपप्राचार्य (वर्ग-३) | ९३००-३४८०० (४४००) | १ | ३ |
| ३ | पाठ्यनिर्देशिका (वर्ग-३) | ९३००-३४८०० (४४००) | १४ | ४२ |
| ४ | लघुटंकलेखक(वर्ग-३) | ५२००-२०२०० (२४००) | १ | ३ |
| ५ | लिपिक (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२४००) | १ | ३ |
| ६ | ग्रंथपाल (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२८००) | १ | ३ |
| ७ | प्रयोगशाळा सहाय्यक (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२०००) | १ | ३ |
| ८ | वॉर्डन (वर्ग-३) | ५२००-२०२०० (२८००) | ३ | ९ |
| ९ | शिपाई (वर्ग-३) | ४४४०-७४४० (१३००) | ३ | ९ |
| | एकुण | | २६ | ७८ |

२. या शासन निर्णयान्वये जालना, रायगड व परभणी येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या (प्रत्येकी २६ पदे) उपरोक्त एकूण ७८ अस्थाई पदांना खालील अटींच्या अधीन राहून दि.१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.

३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांची राहील.

सदर पदांवरील होणारा खर्च, मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-पंचवार्षिक योजनातंर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना, (०६)(०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेत्तर शासकीय रुग्णालये व दवाखाने (अनिवार्य) (२२१० ०२२६)” या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३०१७४७१२९५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2018.10.31 17:07:54 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई

२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कु.क., मा.बा.सं. व शा.आ.), पुणे

३. उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रुषा), मुंबई.

४. उपसंचालक, आरोग्य सेवा (औरंगाबाद मंडळ /ठाणे मंडळ).

५. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, जालना, रायगड, परभणी

७. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना, रायगड, परभणी

८. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.

९. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.

१०. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).